**हिंदुस्थान स्काऊट ॲण्ड गाईड संस्थेचे विना आर्थिक सहाय्य स्वरुपातील महाराष्ट्रातील वरिष्ठ महाविद्यालयांत ऐच्छिक स्वरुपात रेंजर आणि रोवर युनिटचे उपक्रम राबविणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण २०२१/प्र.क्र.१०७ /विशि-५**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- १८ नोव्हेंबर , २०२१

संदर्भ : - संचालक, उच्च व तंत्रशिक्षण संचालनालय, पुणे यांची दिनांक २२/१०/२०२१ तसेच दिनांक ११/११/२०२१ रोजीची पत्रे

**प्रस्तावना:**

भारत देश हा युवकांचा देश म्हणून ओळखला जातो. आपली युवाशक्ती विशाल अदभुत व ऊर्जावान असून देशाला दिशा देण्याचे कार्य करु शकते. आजची युवाशक्ती आपल्या मायभूमीचे भविष्य असून प्रत्येक सामाजिक संस्था व्यक्तिसमूह या नात्याने आपल्याला युवकांची ऊर्जा सकारात्मक दिशेने प्रवाहित झाली पाहिजे. म्हणून प्रत्येक युवक कटिबध्द असला पाहिजे. युवकांच्या भविष्याचा पाया महाविद्यालयीन जीवनात दिशा घेत असतो. हीच ती वेळ जेव्हा आपण त्यांना योग्य शिक्षणासोबत सामाजिक शारिरीक व बौध्दिक विकासासाठी आवश्यक असे मंच उत्तम भविष्यासाठी सहाय्य करु शकतो.

“हिंदुस्थान स्काऊट ॲन्ड गाईड” संस्था ही युवा व खेळ मंत्रालय, भारत सरकार यांचेकडून संपूर्ण देशात स्काऊटिंग व गाईडसचे कार्य करण्यास मान्यता मिळालेली संस्था आहे. हिंदुस्थान स्काऊट ॲन्ड गाईड या संस्थेचे रेंजर व रोवर युनिटचे उपक्रम उच्च शिक्षण विभागातील सर्व महाविद्यालयात राबविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

हिंदुस्थान स्काऊट ॲन्ड गाईड रेंजर व रोवर युनिटचे उपक्रम, उच्च शिक्षण विभागातील सर्व महाविद्यालयात ऐच्छिक स्वरुपात विना आर्थिक सहाय्य तत्वावर राबविण्यास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून परवानगी देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती -**

१. उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिनस्त शासकीय / अशासकीय अनुदानित व कायम विनाअनुदानित स्वयंअर्थसहाय्यित महाविद्यालये व अकृषि विद्यापीठे यांना हा उपक्रम ऐच्छिक राहील.

२. सदर उपक्रमास शासनावर कोणताही आर्थिक व प्रशासकीय भार येणार नाही ( विना आर्थिक सहाय्य तत्वावर ) या अटीवर मान्यता देण्यात येत आहे.

३. महाविद्यालयामधील शैक्षणिक वेळापत्रकाशिवाय अन्य वेळेत / कालावधीत सदर उपक्रम राबविण्यात यावा.

४. सदर उपक्रमाचा अहवाल संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण यांना दर सहामाहीस सादर करण्यात यावा.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२१११११८१६१४४३११०८ असा आहे. सदरहू शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=880d8eb755bcb4455fa360baaa8797820b6265d75275a72f9fa31977bfeff4c9, serialNumber=99eb928028df71ebdfcd2898e209d499192ad3899261fead42f7d38a3141ab69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2021.11.18 16:16:27 +05'30'

**(अजित बाविस्कर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, मलबार हिल मुंबई
२.मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३.मा.मंत्री, (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४.मा. राज्यमंत्री, (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. स्वीय सहाय्यक, प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
६. संचालक, उच्च व तंत्रशिक्षण संचालनालय, पुणे
७. सर्व विभागीय सह संचालक, उच्च शिक्षण
८.सर्व कुलसचिव, अकृषी विद्यापीठे
९. स्वीय सहाय्यक सहसचिव/उपसचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अध्यक्ष / सचिव, हिंदुस्थान स्काऊटस ॲण्ड गाईडस्, शास्त्री वार्ड, पंचायत समिती कॉलनी, गोंदिया , महाराष्ट्र राज्य -४४१ ६०१.